अवयवदान जनजागृती करण्याबाबत महा
अवयवदान अभियान २०१८.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः जागृती-०७१६/प्र.क्र.३२/अधिनियम**
९ वा मजला, नवीन, नवीन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक: ३० ऑगस्ट, २०१८.

**वाचा :**

१) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्र.जागृती-०७१६/प्र.क्र.३२/अधिनियम, दिनांक ०६.०८.२०१६.
२) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्र.जागृती-०७१६/प्र.क्र.३२/अधिनियम, दिनांक १९.०८.२०१७.

**प्रस्तावना :**

सध्या नाविन्यपूर्ण तंत्रज्ञाना आधारे मानवी अवयव प्रत्यारोपणाद्वारे विविध गंभीर आजारांवर उपचार साध्य होत आहेत. त्यासाठी जनतेतून अवयव दानाला चालना मिळावी याकरिता राज्यस्तरावर कार्यक्रम हाती घेऊन जनजागृतीसाठी महा अवयवदान अभियान सन २०१६ पासून राबविण्यात येत आहे. त्याअनुषंगाने सन २०१८ मध्ये महा अवयवदान महोत्सव २०१८ साजरा करण्याबाबत शासनाचा मानस आहे. महा अवयवदान जागृती अभियानामध्ये विविध विभागामार्फत राबविल्या जाणाऱ्या उपक्रमांचे मार्गदर्शन संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयाद्वारे करण्यात आलेले आहे. यात वैद्यकीय शिक्षण विभाग, सार्वजनिक आरोग्य विभाग व उच्च व तंत्र शिक्षण विभाग या विभागामार्फत महा अवयवदान जागृतीबाबत महसूल विभाग, गृह विभाग, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, यांच्या सहकार्याने व समन्वयाने विविध उपक्रम राबविणे प्रस्तावित आहेत.

२. सदर महाअवयवदान महोत्सव-२०१८ जास्तीत जास्त यशस्वी करण्याच्या दृष्टीने या महोत्सवामध्ये हाती घ्यावयाच्या कार्यक्रमाबाबत सर्वसाधारण मार्गदर्शक सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन परिपत्रक:

त्याअनुषंगाने सन २०१८ मध्ये महा अवयवदान महोत्सव-२०१८ दिनांक २५.०९.२०१८ ते २६.०९.२०१८ या कालावधीमध्ये आयोजित करण्याचा शासन निर्णय घेत आहे.

२. महाअवयवदान महोत्सव-२०१८ चे नियोजन राज्यभरातून व्यापक स्वरुपात विविध विभागांच्या समन्वयाने यशस्वीरित्या होण्यासाठी विविध स्तरावर गठीत करण्यात आलेल्या समित्यांद्वारे करण्यात येत आहे. कार्यक्रमाचे आयोजन खालीलप्रमाणे करण्यात यावे :-

१) विभागीय समित्यांचे अध्यक्ष विभागीय महसूल आयुक्त यांनी दिनांक १०.०९.२०१८ रोजी जिल्हा समितीसोबत व्हिडिओ कॉन्फरन्सद्वारे जिल्हास्तरावरील महा अवयवदान कार्यक्रमाच्या नियोजनाबाबत मार्गदर्शन करावे.

२) जिल्हाधिकारी यांनी जिल्हा समिती व तालुका समिती यांच्या समवेत दिनांक १६.०९.२०१८ रोजी महा अवयदान कार्यक्रमाचे जिल्हास्तरावरील नियोजन करावे.

३. **ग्राम विकास विभाग:-**

महाअवयवदान महोत्सवानिमित्त महाराष्ट्रातील सर्व ग्रामपंचायतीमध्ये दिनांक २५.०९.२०१८ रोजी विशेष ग्रामसभा घेण्यात यावी. तसेच अवयवदान प्रचाराचा ठराव व अवयवदानाची प्रतिज्ञा घेण्यात यावी.

अवयवदान जागृती महोत्सवाकरिता दिनांक २६.०९.२०१८ रोजी सकाळी घरासमोर अवयवदान जागृती संबंधी रांगोळी काढणेबाबत या ग्रामसभेत आवाहन करण्यात यावे.

४. **शालेय शिक्षण व उच्च व तंत्र शिक्षण विभाग:-**

संचालक, शालेय शिक्षण; संचालक, उच्च व तंत्रशिक्षण व संचालक, राष्ट्रीय सेवा योजना यांनी दिनांक १०.०९.२०१८ ते दिनांक १६.०९.२०१८ दरम्यान शालेय व उच्च माध्यमिक विद्यालय यामध्ये

अवयवदाना संदर्भात रांगोळी स्पर्धा, निबंध स्पर्धा वक्तृत्व स्पर्धा, व्याख्यान, चर्चा सत्र व कार्यशाळांचे आयोजन करावे. या स्पर्धामध्ये सहभागी विद्यार्थ्यांना दिनांक २६.०९.२०१८ रोजीच्या महा अवयवदान महोत्सवाच्या कार्यक्रमात बक्षीस वितरण करावे.

५. **गृह विभाग:-**

पोलीस महासंचालनालयामार्फत ग्रामीण व शहरी भागातील पोलीस कार्यालयामार्फत आयोजित शांतता समितीच्या बैठकीमध्ये अवयवदान जागृती विषयी माहिती देऊन सदर अभियानाचा प्रचार व प्रसाराकरिता आवाहन करणे, अवयवदान प्रक्रियेसंदर्भात सुलभतेसाठी कार्यशाळेचे आयोजन करावे.

६. **सार्वजनिक आरोग्य विभाग:-**

सार्वजनिक आरोग्य विभागाने सार्वजनिक गणेश उत्सव कार्यक्रमांमध्ये अवयवदान देखावा स्पर्धा आयोजित करावी. सर्व ग्रामपंचायतींनी दिनांक २५.०९.२०१८ रोजीच्या ग्रामसभेदरम्यान अवयवदान जनजागृतीसाठी माहिती उपलब्ध करावी. प्रत्येक ग्रामपंचायतीमध्ये सदर कार्यक्रम यशस्वी होणेसाठी नियोजन करावे.

७. **माहिती व जनसंपर्क विभाग:-**

दिनांक १०.०९.२०१८ ते दिनांक २४.०९.२०१८ रोजी सर्व वृत्तपत्रांमध्ये अवयवदान जागृतीबाबत लेख प्रसिध्दी, मुलाखती आदींचे नियोजन करणे.

अवयव दानाच्या परिणामकारक चित्रफित, जाहिराती तयार करुन त्या दूरदर्शन व आकाशवाणी अशा माध्यमातून या अभियाना दरम्यान प्रसारित कराव्यात.

जनतेमध्ये जनजागृती करण्याकरिता माहिती व जनसंपर्क कार्यालयाकडून अवयव जागृती अभियानामध्ये होणाऱ्या विविध कार्यक्रमांना दूरवर प्रसिध्दी देण्याच्या दृष्टीने नियोजन करावे.

८. **महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ:-**

महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक यांनी दिनांक १०.०९.२०१८ ते दिनांक २४.०९.२०१८ या कालावधीत सर्व संलग्नित महाविद्यालयात रांगोळी स्पर्धा, निबंध स्पर्धा, वक्तृत्व स्पर्धा, चित्रकला स्पर्धा, व्याख्यान, चर्चा सत्र व कार्यशाळांचे आयोजन करुन दिनांक २६.०९.२०१८ रोजीच्या कार्यक्रमात बक्षीस वितरण करावे.

महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक व जे.जे. स्कुल ऑफ आर्टस मुंबई यांच्यामार्फत दिनांक१०.०९.२०१८ ते दिनांक २४.०९.२०१८ या कालावधीत अवयवदान जागृती विषयाचे पोस्टर, प्रचार व प्रचारासाठी स्पर्धा आयोजित करुन त्यापैकी ५ उत्कृष्ट पोस्टरांची निवड करावी. सदर ५ उत्कृष्ट पोस्टर अवयवदान जागृतीसाठी राज्यातील प्रत्येक रुग्णालय, शासकीय कार्यालय, महाविद्यालय येथे लावण्यात येतील.

गणेश उत्सवादरम्यान सर्व संलग्नीत महाविद्यालयाद्वारे विविध गणेश मंडळादरम्यान अवयवदानाचा प्रचार/प्रसार होणेसाठी विशेष प्रयत्न करावा. अवयवदान प्रतिज्ञेचे वाचन करावे. अवयवदानाचे फॉर्म भरुन घेणेबाबत नियोजन करावे.

९. **संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन:-**

बी.जे. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, पुणे यांनी रिबर्थ फाऊंडेशन, पुणे व फिल्म अँड टेलीव्हीजन इंस्टिटयुट ऑफ इंडिया पूणे यांच्या समवेत, पथनाटय स्पर्धांचे आयोजन करुन उत्कृष्ट दोन पथनाटयांची निवड करावी. सदर पथनाटय मुंबई येथे होणाऱ्या अवयवदान महोत्सवाच्या उद्घाटन प्रसंगी सादर करण्यात यावे.

संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन यांनी दिनांक २५.०९.२०१८ रोजी मुंबई येथे अवयवदान जनजागृती विषयी प्रचार व प्रसार व्हावा याकरिता सर्व धर्माचे धर्मगुरु, समाजसेवक, अवयवदाता कुटुंबिय व मान्यवरांच्या उपस्थितीत महा अवयवदान महोत्सवानिमित्त विशेष कार्यक्रमाचे आयोजन करावे.

१०. प्रत्येक ग्राम पंचायत/ नगरपालिका/ महानगर पालिकेद्वारे दिनांक १०.०९.२०१८ ते दिनांक २४.०९.२०१८ या कालावधीत संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेच्या सार्वजनिक बागेतील भिंतींवर अवयवदान जागृतीचे चित्र रेखाटण्यात यावे.

११. संबंधित आयोजन समितीने दिनांक २५.०९.२०१८ रोजी भजनी मंडळ कीर्तनकार, प्रबोधनकार यांच्यामार्फत अवयवदान विषयी प्रचार व प्रसार करावा. सर्व विभागांनी अवयवदान **सोबत जोडलेल्या परिशिष्ट "अ" नुसार** जनजागृतीची प्रतिज्ञा घ्यावी.

१२. सर्व संबंधित विविध कार्यक्रम आयोजक (उदा. विविध शासकीय कार्यालये, शाळा महाविद्यालये, संस्था) यांनी अवयवदान जागृती करिता आयोजित केल्या जाणाऱ्या कार्यक्रमांमध्ये एक सारखेपणा येण्यासाठी अवयवदान जनजागृती टी-शर्ट दिनांक २४ व २५ सप्टेंबर, २०१८ रोजीच्या कार्यक्रमात वापरावेत.

१३. अभियानाचा अनुषंगिक खर्च सहभागी विभागांनी त्यांच्याकडील उपलब्ध निधीतून अथवा स्थानिक CSR च्या माध्यमातून व एनजीओचा सामाजिक संस्थांचा सहभाग घेऊन करावा.

१४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८३०११५९११७५१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Surendra Pralhad Chankar

Digitally signed by Surendra Pralhad Chankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=MEDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=da74ced4daa59e5121be348655e71412ea68827bae27cd8d480eb3963ff77726, cn=Surendra Pralhad Chankar
Date: 2018.08.30 16:13:11 +05'30'

**(सुरेन्द्र प्र. चानकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राजभवन, वाळकेश्वर मार्ग, मलबार हिल, मुंबई-४०००३५.

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
३) सर्व पालकमंत्री.
४) मा. मंत्री (वै.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
५) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानभवन, मुंबई ४०००३२.
६) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, विधानभवन, मुंबई ४०००३२.
७) सर्व खासदार, सर्व आमदार, सर्व महापौर, सर्व जिल्हापरिषद अध्यक्ष,
८) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
९) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१०) अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
११) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१२) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१३) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१४) प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१५) सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई ४०००३२.
१७) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१८) सर्व विभागीय आयुक्त महसूल,
१९) कुलगुरु, मुंबई विद्यापीठ, मुंबई व कुलगुरु स्थानिक विद्यापीठ,
२०) सर्व जिल्हाधिकारी,
२१) स्थानिक पोलीस आयुक्त,
२२) जिल्हा पोलीस अधिक्षक,
२३) सर्व आयुक्त महानगरपालिका,
२४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
२५) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२६) संचालक, आयुष संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२७) संचालक, आरोग्य संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२८) संचालक, हाफकीन प्रशिक्षण संस्था, मुंबई.
२९) संचालक, ईएसआयएस रुग्णालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३०) सर्व जिल्हा शल्यचिकित्सक,
३१) अध्यक्ष, विभागीय अवयव प्रत्यारोपण समिती (ZTCC), मुंबई.
३२) विभागीय अवयवदान प्राधिकरण समिती प्रमुख, मुंबई.
३३) सर्व उप-संचालक आरोग्य सेवा.
३४) सर्व अधिष्ठाता शासकीय/खाजगी वैद्यकीय महाविद्यालये.

३५) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी.
३६) सर्व  जिल्हा शिक्षण अधिकारी.
३७) सर्व मुख्याधिकारी नगरपालीका.
३८) सर्व जिल्हा माहिती अधिकारी.
३९) सर्व सह/उपसचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
४०) सह/उपसचिव (सार्वजनिक आरोग्य/ उच्च व तंत्र शिक्षण /गृह/ग्राम विकास विभाग/ वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
४१) अवर सचिव/कक्ष अधिकारी, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
४२) निवड फाईल (अधिनियम).

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**(शासन परिपत्रक क्र.जागृती ०७१६/प्र.क्र.३२/अधिनियम, दि.३० ऑगस्ट, २०१८ चे सहपत्र)**

## परिशिष्ट-अ
## अवयवदान प्रतिज्ञा

माणूसकी हा माझा मूळ धर्म आहे. पिडितांच्या व गरजूंच्या जीवनात आनंद फुलविणे हीच माणूसकीची खरी शिकवण आहे अशी माझी श्रध्दा आहे.

अवयवदानामुळे गरजू रुग्णांच्या जीवनात आनंद फुलविणे शक्य होते तसेच मृत्यूपंथाला लागलेल्या व्यक्तीला नवा जन्म देता येता. त्यामुळे हे सर्वात मोठे पुण्यकर्म आहे यावर माझा विश्वास आहे.

मी प्रतिज्ञा करीत आहे की, माझ्या शरीरात जे जे अवयव दुसऱ्या मानवाच्या जीवनात आनंद फुलवू शकतील अशा अवयवांवर माणूसकीचा पहिला हक्क व अधिकार असेल. माझ्या अवयवांचा अशा माणूसकीच्या पुण्यकार्यासाठी उपयोग झाला पाहिजे असा माझा आग्रह आहे. माझ्या पुढील पिढयांनी या आग्रहांचा मान राखावा म्हणून मी त्यांना सतत स्मरण देत राहीन आणि पुढील पिढयांवर असेच संस्कार घडावेत यासाठी मी प्रयत्नशील राहीन.

******